सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ तालुक्यात मौजे अनगर येथे 'अपर तहसील कार्यालय' सुरु करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्राफेब-२०२४/प्र.क्र.४१/म-१०**
पहिला मजला, मंत्रालय मुख्य इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
तारीख: २४ जुलै, २०२४

**वाचा :-**

**उप आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मह-३/प्रशा/कावि/१६९/२४, दि.१२.०३.२०२४**

**प्रस्तावना:-**

सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ या तालुक्यात १०४ महसूली गावांचा समावेश आहे. सन २०११ च्या जनगणनेनुसार सदर तालुक्याची लोकसंख्या २,७६,९२० इतकी आहे. या तालुक्याचे वाढते शहरीकरण व यामुळे वाढलेल्या प्रशासकीय कामकाजाचा निपटारा जलदगतीने करण्याकरीता तसेच प्रशासकीय सोय आणि नागरिकांच्या सोयी व सुलभतेच्यादृष्टीने सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ तालुक्यातील अनगर येथे स्वतंत्र 'अपर तहसील कार्यालय' स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ तालुक्यात अनगर येथे 'अपर तहसील कार्यालय' स्थापन करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार, जिल्हाधिकारी सोलापूर, यांनी मोहोळ तालुक्यातील तहसील कार्यालयाचे पुढे निर्देशित केल्याप्रमाणे विभाजन करुन मौजे अनगर येथे 'अपर तहसील कार्यालय' तात्काळ सुरु करण्यात यावे.

२. जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी स्थानिक तहसीलदार यांच्याशी चर्चा करुन अनगर, ता.मोहोळ, जि.सोलापूर येथे सध्या उपलब्ध असलेल्या इमारती/जागेपैकी सुयोग्य अशा ठिकाणी अपर तहसील कार्यालय तात्काळ कार्यान्वित करावे.

३. विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांनी अनगर 'अपर तहसील कार्यालयाकरीता' नवीन पदे मंजुर होईपर्यंत पर्यायी व्यवस्था म्हणून मोहोळ तहसील कार्यालयातून व पुणे विभागातून १ अपर तहसीलदार, १ नायब तहसीलदार, १ अव्वल कारकून व ४ महसूल सहायक (लिपीक-टंकलेखक) अशी एकूण ७ पदे उपलब्ध करुन द्यावेत.

४. सोलापूर जिल्ह्यातील मोहोळ तालुक्यातील तहसील कार्यालय मोहोळ व 'अपर तहसील कार्यालय', अनगर यांच्या कार्यक्षेत्रात खालीलप्रमाणे महसुली मंडळ व गावे राहतील:-

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | महसूल मंडळे | महसुली गावे |
|---|---|---|---|
| १ | तहसील कार्यालय,मोहोळ | **५**<br>(मोहोळ, सावळेश्वर, टाकळी सिकंदर, कामती बु., वाघोली) | ६१ |
| २ | अपर तहसील कार्यालय, अनगर | **४**<br>(अनगर,शेटफळ,नरखेड, पेनूर) | ४३ |

५. सोलापूर जिल्ह्यातील तहसील कार्यालय, मोहोळ तसेच 'अपर तहसील कार्यालय', अनगर यांच्या कार्यक्षेत्रातील महसूल मंडळांतर्गत तलाठी साझे व त्यामध्ये अंतर्भूत होणा-या गावांची यादी प्रसिध्द करण्याबाबतची कार्यवाही जिल्हाधिकारी,सोलापूर यांचे स्तरावर करण्यात यावी.

६. अपर तहसीलदार अनगर,ता.मोहोळ,,जि.सोलापूर यांचे प्रतिवेदन अधिकारी म्हणून संबंधित उपविभागीय अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून जिल्हाधिकारी,सोलापूर हे काम पाहतील.

७. महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ चे कलम १३ च्या पोट-कलम (३) नुसार, तहसीलदार, मोहोळ यांना प्रदान करण्यात आलेल्या शक्ती अपर तहसीलदार, अनगर यांना त्यांना नेमून दिलेल्या कार्यक्षेत्रापुरत्या प्रदान करण्याबाबत स्वतंत्रपणे अधिसूचना निर्गमित करण्यात येईल.

८. तहसील कार्यालय, मोहोळ या कार्यालयाकरीता येणारा खर्च हा ज्या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात येतो, त्याच लेखाशीर्षाखाली अनगर अपर तहसील कार्यालयाकरीता येणारा खर्च दर्शविण्यात यावा. सदरचा खर्च सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. सदरहू लेखाशीर्षाखाली मंजूर तरतूद अपुरी पडत असल्यास, आठमाही अंदाजपत्रक सादर करताना वाढीव तरतूदीची मागणी करावी; ते शक्य नसल्यास पूरक मागणीचा प्रस्ताव शासनास सत्वर सादर करण्यात यावा.

९. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.४३८/आ.पु.क., दि.१५.०७.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२४१५५००२३०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR

Digitally signed by SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=bc3e3742bf263c80937ab54c636ad893656171177467ba8656a12c226f3029a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C55205CA6D1113BFAEC735BD2D1C5326D6B007C5CD3A46A6E4C4857E58AD2AFE, cn=SUNIL SHRIDHARRAO KOTHEKAR
Date: 2024.07.24 16:04:14 +05'30'

**( सुनिल कोठेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (रवका), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.अपर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
१५.जिल्हाधिकारी, सोलापूर.
१६.उपविभागीय अधिकारी, पंढरपूर, जिल्हा सोलापूर.
१७.तहसीलदार, मोहोळ, जिल्हा सोलापूर.
१८.अपर तहसीलदार, अनगर, ता.मोहोळ,जि. सोलापूर.
१९. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
२०. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२१. कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग ( कार्यासन ई-३/ ई-८/ ई-९/ ई-१०/ ब-१).
२२. वित्त विभाग ( का. विसू-१/ अर्थसंकल्प -६/ व्यय-९/ आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
२३. महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने.
२४. निवड नस्ती-कार्यासन म-१०.